कवितांसाठी साप्ताहिक काढणं हा मूर्खपणा आहे. हल्ली कोणी कविता वाचत नाही, कवि स्वतःच लिहीतात आणि स्वतःच वाचतात.

अशा जमान्यात आम्ही "नेटाक्षरी" हे साप्ताहिक सुरू केले आहे , 'आम्ही' म्हणजे ऑर्कुट वर जमलेले कविलोक. सुमारे ३४००० वाचकांच्या आमच्या कम्युनिटी आहेत ,मराठी कविता , काव्यांजली इत्यादी. लिहीतो , एकमेकांना ऐकवतो महफ़िल करतो मजा घेतो , सगळं आपआपसात.

पण आता मनात आलं ऑर्कुट बाहेर पडायचं आणि कवितांना इतरांपूढे ठेवायचं , काय 'अंडी टमाटी' मारतील ती खायची पण आपसात " वा वा ! छान !" म्हणणं बस झालं

तर हा घ्या नेटाक्षरी चा अंक

**" आवडला तर मित्रांना फ़ौरवर्ड करा**
**सुधारणा आम्हाला कळवा "**

netaksharee@gmail.com

या अंक नियमीत मिळण्यासाठी तुमचा ईमेल आम्हाला कळवा

**संपादक मंडळ**

यजमान संपादक –
**आनंद माने ( सोलापूर )**

सहसंपादक –
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**
**सुरुची नाईक ( नागपूर )**
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

अतिथी संपादक –
**प्रभा प्रभुदेसाई ( चेन्नई )**






**या अंकात काय वाचाल ?**

- या आठवड्यातील सुपरहिट कविता **"राजे तुम्ही रक्त सांडलं स्वराज्यासाठी"**
- 'मी मराठी'च्या **घोषणांना वैतागलेला** मराठी माणूस काय सांगतोय ?
- **मुम्बया** ची एक रापचिक कविता
- **ऑड वाटेने** जाणा-या एका आगळ्या वेगळ्या कवितासंग्रहाचं परीक्षण

**बाप्पा……**



परवा भेटला बाप्पा, जरा वैतागलेला वाटला
दोन क्षण दम खातो म्हणुन माझ्याघरी टेकला

उंदिर कुठे पार्क करु ? लॉट नाही सापडला
मी म्हटलं सोडून दे, आराम करु दे त्याला

तु पण ना देवा कुटल्या जगात राहतोस ?
मर्सिडीजच्या जमान्यात उंदरावरुन फ़िरतोस

मर्सिडीज नाही निदान नॅनो तरी घेउन टाक
तमाम देव मंडळीमध्ये भाव खाउन टाक

इतक्या मागण्या पुरवताना जीव माझा जातो
भक्तांना खुश करेपर्यंत माझा जीव दमतो

काय करु आता सारं मॅनेज होत नाही
पुर्वीसारखी थोडक्यात माणसं खुशही होत नाहीत

इमिग्रेशन च्या रिक्वेस्टस ने सिस्टम झालीये हॅंग
तरीदेखील संपत नाही भक्तांची रांग

चार आठ आणे मोदक देउन काय काय मागतात
माझ्याकडच्या फ़ाइल्स नुसत्या वाढतच जातात

माझं ऎक तु कर थोडं थोडं डेलिगेशन
मॅनेजमेंटच्या थेयरीमध्ये मिळेल सोल्युशन

एम. बी. ए. चे फ़ंडे तु शिकला नाहिस का रे ?
डेलिगेशन आफ़ॅ ऍथॉरीटी ऎकलं नाहीस का रे ?

असं कर बाप्पा एक लॅपटॉप घेउन टाक
तुझ्या सा-या दुतांना कनेक्टीवीटी देउन टाक

म्हणजे बसल्याजागी काम होइल धावपळ नको
परत येउन मला दमलो म्हणायला नको

माझ्या सा-या युक्त्यांनी बाप्पा झाला खुश
माग म्हणाला हवं ते एक वर देतो बक्षीस

सी. ई .ऒ . ची पोझिशन, टाउनहाऊसची ओनर शिप
इमिग्रेशनदेखील होईल लवकर मग ड्युअल सिटीझनशिप

मी हसले उगाच, म्हंटलं, देशील जे मला हवं
म्हणाला मागुन तर बघ, बोल तुला काय हवं

**‘पारिजातकाच्या सड्यामध्ये हरवलेलं अंगण हवं’**
**‘सोडुन जाता येणार नाही असं एक बंधन हवं’**

**‘हवा आहे परत माणसातला हरवलेला भाव’**
**‘प्रत्येकाच्या मनाच्या कोप-यात थोडासा शिरकाव’**

**‘देशील आणुन परत माझी हरवलेली नाती’**
**‘नेशील मला परत जिथे आहे माझी माती’**

**‘इंग्रजाळलेल्या पोरांना थोडं संस्कृतीचं लेणं’’**
**‘आई-बापाचं कधीही न फ़िटणारं देणं’**

**‘कर्कश्श वाटला तरी हवा ढोल-ताशांचा गजर’**
**‘भांडणारा असला तरी चालेल पण हवा आहे शेजार’**

**‘यंत्रवत होत चाललेल्या मानवाला थोडं आयुष्याचं भान’**
**‘देशील का रे देवा माझ्या पदरात एवढ दान ? ’**

‘‘तथास्तु’’ म्हणाला नाही सोंडेमागुन नुसता हसला
सारं हाताबाहेर गेलंय पोरी **‘‘सुखी रहा’’** म्हणाला….

**--दीपा मिट्टीमनी कुलकर्णी , कॅनडा**

## जिंकता जिंकता हरण्यासाठी



लाख क्षण अपूरे पडतात
आयुष्याला दिशा देण्यासाठी
पण, एक चूक पुष्कळ आहे
ते दिशाहीन नेण्यासाठी

किती प्रयास घ्यावे लागतात
यशाचं शिखर चढण्यासाठी
पण, जरासा गर्व पुरा पडतो
वरून खाली गडगडण्यासाठी

देवालाही दोष देतो आपण
नवसाला न पावण्यासाठी
कितींदा जिगर दाखवतो आपण
इतरांच्या मदतीला धावण्यासाठी

किती सराव करावा लागतो
विजयश्रीवर नाव कोरण्यासाठी
पण,जरासा आळस कारणीभूत ठरतो
जिंकता जिंकता हरण्यासाठी

कितीतरी उत्तरं अपुरी पडतात
आयुष्याचं गणित सुटण्यासाठी
कितीतरी अनुभवातून जावं लागतं
आयुष्य कोडं आहे पटण्यासाठी

विश्वासाची उब द्यावी लागते
नात्याला जीवनभर तारण्यासाठी
एक अविश्वाचा दगड सक्षम आहे
ते कायमचं उध्वस्त करण्यासाठी

**- सनिल पांगे**

## घोषणांनी पोट कसं भरेल

मराठी म्हणल्यावर जर कुणाच्या
कपाळावर पडली आठी
आठवा तुकोबा, माथ्यावरती
सणकून हाणा काठी

मी मराठी मी मराठी
नुसतं म्हणून चालेल काय
काम नाही धंदा नाही
दगड मारून भागेल काय

मराठी माणसा जागा हो
सोंग तरी सोडून दे
ताकद दाखव मनगटातली
नुसता दंगा सोडून दे

दादागिरी चालणार नाही
उप-यांचं ऐकून घेणार नाही
मग स्वतःतरी कष्ट कर
म्हणजे कुणी बोलणार नाही

आपल्यासाठी आपणच
कळणार कधी आपल्याला
लोकांना कशाला दोष द्यायचा
जमणार कधी आपल्याला

हे येतात ते येतात
वाट्टेल तो धंदा करतात
आपलेच भाऊबंद लाजून,घाबरून
सगळ्यांचाच वांदा करतात



अस्तित्व असतं विचारात ,कृतीत
विसर पडून चालणार नाही
काम करू , प्रगति करू
आंदोलनानं भागणार नाही

सरकार करेल, साहेब करेल
करतील तेंव्हा करतील
आपण आत्ताच हालचाल करू
निदान पोटं तरी भरतील

अस्मिता हवी, अभिमान पाहिजेच
आपल्या आपल्या मातीचा
पण त्यानं फ़क्त मन भरतं
विचार करा भाकरीचा

भूक लागल्यावर भाकरीच हवी
घोषणांनी पोट कसं भरेल ?
आधी विचार मराठीचाच
पण उपाशीपोटी कसा सुचेल ...

**- स्वप्नील बापट**

## शब्दांनी करता निशब्द तुला



शब्दांनी करता निशब्द तुला
घे हातामध्ये लगाम तु
कर मौनालाही सलाम तु

नकोस थांबू अर्ध्यावरती
शब्दच होईल तुझा सारथी

पूढे पहा तु पुढे चाल
बहोत सोसले हाल-हवाल

शब्दांचे होतील वार तुझ्यावर
शब्दच होतील स्वार तुझ्यावर

नकोस देऊ भाव तयांना
सरस ठराव्या तुझ्या भावना

- **आनंदा**

## जन्मोजन्मीचा बंध आपसूक कळतो

शंभर माणसं असतात आसपास
का एकच चेहरा आपलासा वाटतो ?
का तो दिसता, चेहरा आपला खुलतो ?

संगतीला कुण्णीही चालतं
का एकाजवळंच मोकळं होतो ?
का भरून येता त्याच्याच कुशीत शिरतो ?

अनेक दुखापती पाहतो सहज
का एकाच्याच दुखण्याने जीव कळवळतो ?
का त्याच्यावरचे वार स्वतःवर झेलतो ?

सरळ शब्द हमखास कोडं घालतात
का एकाचंच मौनही धडाधड वाचतो ?
का त्याच्या एका शब्दासाठी श्वास अडकतो ?

आठवणींचे वादळ वेडावत येते
का एकाच्याच आठवणीत मनसोक्त भिजतो ?
का भर उन्हात त्याच्यावर छाया धरतो ?

जुने नवे स्पर्श तर होतात वरवर
का एकाचाच सहवास मनाला गुदगुल्या करतो ?
का त्याच्या मिठीसाठी आजन्म आसुसतो ?



कळायला वेळ थोडा जरूर जातो
पण जेंव्हा तर्क वितर्कांच्या पल्याड पोहचतो
जन्मोजन्मीचा बंध आपसूक कळतो ..

जन्मोजन्मीचा बंध आपसूक कळतो ...

- **स्वप्ना कोल्हे**

## औन्दा आमची बी दिवाळी हाय
## ( स्वप्न की सत्य )

औन्दा आमची बी दिवाळी हाय
आंगान शेणान सारावल
भितीला चुण्यान रंगवलं
दाराला झेन्डूचं तोरण सजलं हाय

औन्दा आमची बी दिवाळी हाय

सरकारनं कर्ज माफ़ केलया
रोजगार बी दिलाया
शेंबी जातीया शाळंला
आणखी एक फ़ाशी टळली हाय

औन्दा आमची बी दिवाळी हाय

कापसाला भाव लै दिला
बॅन्कत पैसा आडका साठला
शेतात झालया सोनं
नवा बैलबी जुपला हाय

औन्दा आमची बी दिवाळी हाय



आता नाय शेतकरी उपाशी राहायचा
कर्जाच्या दोरानं जीव नाय जायचा
हसतं खेळतं घर-गाव समदं
गरीबानं पण सोन्याचा धुर पाहिला हाय

औन्दा आमची बी दिवाळी हाय

- **दीपू**
  **(दिपक साळूंके )**

**मी श्रीमंत झालो**

काल एका वडा पावच्या पेपरवर
सहजच वाचले..
वाचायचे कारण
शेवटच्या पावाला चटणी पूसून
घेत होतो

आयला बीडीसाठी पैसे नाही
पेपर कुठून घेऊ
बातमी होती
जगातील सर्वात श्रीमंत
शहराच्या यादीत
मुंबई ३० व्या क्रमांकावर

का ?
तर इथल्या जागेचा भाव

आयला
आपणपण श्रीमंत झालो की

फुटपाथवर एक नजर टाकली



जगलो इथं
जगणार इथं
जाणार इथं

आपली जागा हीच
हीच आपली मायभू

ऐ मी श्रीमंत झालो
मी श्रीमंत झालो
ऐ मी श्रीमंत झालो

**- मुम्बया**

## संकेत

कधीतरी मज देऊन जा तुझ्या
निरागस डोळ्यातील पाणी
जरी तू असलीस दूरवर
वा-यावर वाहतील आपुली गाणी

सुने सुने तू करूनी गेलीस
पक्षांचे बागडते आंगण
उंच नभीच्या सप्ततारका
धरतात तवसाठी रिंगण

आताशा मज वाचवत नाहीत
कोमेजल्या फुलावरचे रंग
वारा घुटमळतो सभोवती
घेऊनी ओल्या पावसाचे गंध

मौनानेही मौन सोडले
डोळयांच्या जाहल्या वाटा
एकच शुक्राची नभी चांदणी
अनंत पसरल्या प्रकाशलाटा

तुझ्या परतण्याचे संकेत
सांग तू पहाट दवाला
थेंब मोत्यासम तेजाळताना
शलाका निरोप देतील जगाला

- **विजयकुमार**



## कारण माझा देश महान आहे



उपाशी इथली आई आहे
उपाशी तिच्या पोटचे लेकरू
स्वतःचे पोट भरण्यासाठी
कापितो माणूस गाईसमोर तिचे वासरू

त्या वासराच्या जीवापेक्षा इथे
प्रिय प्रत्येकाला आपली तहान आहे
कारण माझा देश महान आहे

इथे पैशासमोर,
आई , बाप सूद्धा लहान आहे
कारण माझा देश महान आहे

हा तोच देश आहे
जिथे कर्ज बाजारी शेतकरी आत्महत्या करतो
हा तोच देश आहे जिथे
मुलीला या जगात येण्याआधीच आम्ही मारतो
आणि जिथे धनंजय सारखा माणूस
६ वर्षाच्या मुलीवर बलात्कार करतो

त्या चिमुकलीचा जीव घेऊनही
मानव अधिकारवाले म्हणतात
की त्याला जगण्याचा अधिकार आहे
कारण माझा देश महान आहे

इथे माणसे नाही, माणसाळलेली जनावरे राहतात
जिवंतपणीच काय मेल्यावरही स्मशानात
मुडदे जात विचारतात

इथे अता फ़क्त उरलेला
जीवंत माणसांचा स्मशान आहे
कारण माझा देश महान आहे

**- निशब्द (देव)**

## मरण प्रेमवीराचे

ह्या कंठाच्या घोटासाठी
तु आसुसलेला होतास
कितीक वेळा घाला
तु भ्याड घातला होतास

मी घाव तुझे असंख्य
सहज पचवले होते
घायाळ ह्रदयासाठी
घायाळ शरीरही होते

आशेचा दीप तो विझला
अन जगणे मरणचि झाले
हे प्राण घेऊनी हाती
तुज हाती ठेवले होते

मी मिटूच शकलो नाही
डोळे, ती दिसली होती
मेल्यावरही ह्रदयी
धडधड ही चालूच होती

जळण्यासाठी उरलो नाही
आधीच जाहलो खाक
डोळे अन ह्रदयाची बघ
लोकांनी रचली राख



- **रसप**
**(रणजित पराडकर)**

## राजे तुम्ही रक्त सांडले स्वराज्यासाठी......



राजे तुम्ही रक्त सांडले स्वराज्यासाठी......
आम्ही आज तुमचे किल्ले बघतो केवळ मजेसाठी.....
तुमच्या मावळयांनी कडे चढ़ले तुमच्या स्वप्नांसाठी
आम्ही आडवाटेनेही थकुन जातो किल्ल्यावर जाण्यासाठी
तुमच्या सिंहाचे स्मारके आज युवकांचे दारुचे अड्डे
सिंहगडाच्या पायथ्याशी रेव पार्टयांचे सडॆ
मराठ्यांच्या स्मारकांचॆ हे हाल आता बघवत नाही
मराठा असल्याचे किल्ल्यावर गेल्यावर बोलवत नाही
आमची मक्का मदिना आज धुळीखाली गाडली जात आहे
कधीकाळच्या राज्य कर्त्यावर आज आरक्षण मागण्याची वेळ
लादली जात आहे
राज गड पासुन राय गडा पर्यंतच्या आजही शोधाव्या लागतात
वाटा
ह्या देशात तुम्ही होता म्हणुन आज होऊ शकले बिरला अन टाटा
शिर्डीच्या बाबांना सिंहासन अन छत्रपतीच्या समाधीला उन्हाच्या
झळा
मराठ्यांचे मंत्री अन राजकर्ते शिव जयंतीला निधी करोडोंचा
करतात गोळा
राजांच्या नावांवर आज निघतात कित्येक सेना
अन मराठी लोकांसाठी लढ़णा-यांच्या नावावर दाखल होतो गुन्हा
राजे बरं झालं तुम्ही लवकर गेले
नाहीतर हे दुखः तुम्हास सहन नसते झाले
तुमच्या नावासाठी लढताना मेले ते तुमचॆ मावळे
आज तुमच्या नावावर करतात राजकारण
अन भरतात आपली घरे ते आमचे डोम कावळे
नशिब राजे तुम्ही गड डोंगरावर बांधले
जर असते कशी जमीनीवर तर त्याचे सात बारा ह्यांनी नक्कीच
असते बदलले
कवी ग्रीष्म करतो सगळयांना एक विनंती
राखा पावित्र्य गडाचे आज
नाहीतर शोधावे लागतील पुरावे आपल्या इतिहासाचे......

**- कवी ग्रीष्म**



**काव्यसंग्रह परीक्षण – “ऑड वाटेच्या कविता”**
**प्रकाशक - ई- साहित्य प्रकाशन**
**मूल्य रू- ६०**

कुठलाही काव्यसंग्रह जेंव्हा आपण वाचायला घेतो तेंव्हा त्याच्या निर्मीतीप्रक्रियेत साहजिकच आपल्याला फ़ारसा रस नसतो, कारण, मुळात रस असण्याची शक्यता कमीच. पण नावापासूनच आपलं वेगळेपण ठसवणा-या “ ऑड वाटेच्या कविता” ह्या काव्यसंग्रहाच्या निर्मीतीचा रसरशीत गाभा आपल्याला जाणून घ्यायला नक्की आवडेल.

ऑर्कुट ह्या इंटरनेट साईटवरील कवी,कवयित्रींचा हा काव्यसंग्रह भौगोलिक स्थान विविध असले तरी “ मराठी कविता” ह्या समान दुव्याने स्नेहबंध गुंफ़ले , ऑर्कुट कम्युनिटीचा “परिवार” झाला आणि त्या परिवाराने स्वतःची ई-साहित्य प्रकाशन संस्था स्थापन केली . सिंगापूर येथील डॉ. मुक्ता पाठक शर्मा आणि चेन्नई येथील प्रभा प्रभु देसाई ह्या विदुषी, कम्युनिटी सदस्या संपादिका म्हणून लाभल्या.संपादनाचे सर्व काम इंटरनेट आणि फ़ोनच्या माध्यमातून झाले. पुस्तकाच्या छपाई चे काम ई-साहित्य प्रकाशनाने पेलले.आणि एक विलक्षण लक्षवेधी काव्यसंग्रह तयार झाला ज्याचे प्रकाशन सुप्रसिध्द गीतकार प्रवीण दवणे यांच्या हस्ते ६ जुलै २००८ रोजी कल्याण येथे झाले .

ह्या काव्यसंग्रहाच्या आकर्षक मुखपृष्ठावर बेधुंद प्रवासास निघालेली सावरी तुमच्या अंतर्मनावर तरंगत राहिल. कवितेखाली दिलेली कवीची खास ओळख़ हे या काव्यसंग्रहाचं खास वैशिष्ट्य. प्रत्येक कविता ही त्या कवीच्या प्रतिभेची चूणूक दाखवणारी . अशी कवीमनं जी कल्पनेची झेप घेताना वास्तवाशी असलेली नाळ तोडत नाहीत.

ह्यातली कविता, कधी पतंग उडवण्यासारख्या मनमौजी घटनेतून माणसांचा आयुष्यविषयक दृष्टीकोन उलगडवते तर कधी स्वकेंद्रीत आधुनिक जीवनशैलीच्या गुंत्यात आपले पाय कसे अडकलेले असतात हे दाखवते. तसेच भिकारणीला भीक घालता घालता तिचेच कटोरे आपल्या हातात कसे दिसते ही कैफ़ियत मांडते तर स्वतःवरच राज्य करू पाहणा-या तत्वांना बासनात गुंडाळून ठेवण्याची हिम्मत ठेवते. कधी लोकलच्या प्रवासाला घेऊन जाते तर कधी अनामिक भटकंतीला. कधी अश्रूंना माझी कहाणी सांगू नका म्हणून विनवते तर कधी अश्रूंभोवतीच धरण उभारते.

भावनांच्या एका नितांत सुंदर प्रवासाला घेऊन जाते ही “ऑड वाट” .आणि , अशा या काव्यसंग्रहाचा आस्वाद घेता घेता तुम्ही स्वतःदेखील कधी कविता लिहायला लागाल तुमचं तुम्हालाच कळणार नाही.
तर असा हा ज्ञानेश्वर, तुकोबांच्या मराठी भाषेला नोबेल मिळवून देण्याचं स्वप्न उरी बाळगलेल्या कवींचा काव्यसंग्रह तुम्हाला नक्कीच आवडेल, जरूर वाचा ... ऑड वाटेच्या कविता

**-स्वप्ना कोल्हे**

